केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियान
गोंदिया नगरपरिषदेच्या मलनिःस्सारण प्रकल्पास
प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
(रु. २४९.६८ कोटी)

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक अमृत-२०२४/प्र.क्र.३४३/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक : १० जुलै, २०२४**

**संदर्भ :-**

१. केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत अमृत २.० अभियानाच्या ऑक्टोबर, २०२१ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना
२. नगर विकास विभाग, शासन निर्णयक्र: अमृत २०२२/प्र. क्र.१४१/नवि - ३३, दिनांक १४जुलै, २०२२.
३. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: अमृत २०२२/प्र.क्र.२०३/नवि - ३३, दिनांक १६सप्टेंबर, २०२२.
४. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र: ग्रापाधो-२०२१/ प्र.क्र.१२२/ पापु-०६, दिनांक २९ जून, २०२२
५. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र : अमृत २०२३/प्र.क्र.३३१/नवि- ३३, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०२३.
६. नगर विकास विभाग शासन निर्णय क्र: अमृत-२०२४/प्र.क्र.२०१/नवि-३३, दिनांक १३ मार्च, २०२४.
७. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर विभाग यांचे तांत्रिक मान्यतेचे आदेश क्र.मजीप्रा/मुअना/तांशा-२/१०६९/२०२४, दिनांक २८ मे, २०२४.
८. अमृत २.० अभियानांतर्गत गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय तांत्रिक मान्यता समितीच्या दिनांक १० जून, २०२४ रोजीच्या झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानाची संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ वर्षापासून राज्यामध्ये अंमलबजावणी करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत पाणीपुरवठा, सरोवरांचे पुनरुज्जीवन व हरित क्षेत्र विकास इ. पायाभूत सुविधांची निर्मिती राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये करण्यात येणार आहे आणि यापूर्वीच्या अमृत अभियानांतर्गत समाविष्ट असलेल्या राज्यातील ४४ शहरांमध्ये मलनि:स्सारणाची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. त्यानुसार सदर अभियानांतर्गत राज्याच्या रु. २७७९३ कोटी प्रकल्प किंमतीच्या राज्य जलकृती आराखडयास (फक्त Capex किंमत) केंद्र शासनाने मान्यता दिलेली आहे. यामध्ये गोंदिया नगरपरिषदेच्या मलनिःस्सारण प्रकल्पाचा समावेश असून संदर्भाधिन क्र. ७ अन्वये मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार त्यास राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या दिनांक १० जून, २०२४ बैठकीत मंजूरी दिलेली आहे. सदर प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

०१. केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानांतर्गत गोंदिया नगरपरिषदेच्या रु. २४९.६८ कोटी प्रकल्प किंमतीच्या मलनि:स्सारण प्रकल्पास परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद केलेल्या विवरणपत्रात केल्यानुसार व मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर विभाग यांनी दिनांक २८ मे, २०२४ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहून या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्पाच्या वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे :-

(रु.कोटीमध्ये)

| नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | प्रकल्प किंमत | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ३३.३३ % ) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ५१.६७ %) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या १५ %) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| गोंदिया नगरपरिषद | २४९.६८ | ८३.२२ | १२९.०१ | ३७.४५ |

०२. गोंदिया नगरपरिषदेच्या मलनि:स्सारण प्रकल्पातील घटक व त्यांचे अंदाजित किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे.

| Sr. No. | Description | Amount in Rs. |
|---|---|---|
| | Work of Zone 1 North | |
| 1 | Working survey & confirmation of level | 1500000 |
| 2 | Estimate for Sewerage Network | |
| 2.1 | Estimate for Sewerage Network Phase II & Balance Work of Zone 2 DWC pipe 150 to 250 mm dia of length 78.127 km & RCC NP-III pipe 300 to 800 mm dia of length 7.386 km (Total L = 85.513 km) | 763647529 |
| 2.2 | Reinstating of CC roads | 720554684 |
| 2.3 | Estimate for Property Connection 20000 No.s | 232914095 |
| 2.4 | Estimate for Push Through for NH & Railway crossing | 22127287 |
| 3 | Estimate for Wet Well with Pump House | |
| 3.1 | Estimate for Wet Well with Pump House PS Zone 2 | 5918810 |
| | Wet Well Diameter=5.50 m & Depth= 8.45 m | |
| | Pump House Diameter =5.50 m & Height 6.5 m | |
| 3.2 | Estimate for Wet Well with Pump House STP | 13559187 |
| | Wet well Diameter=9 m & Depth= 12.61 m | |
| | Pump House Diameter =9 m & Height 6.5 m | |
| 4 | Pumping Machinery | |
| 4.1 | Non clog Submersible sewage Pumping Machinery at Wetwell PS Zone 2 | 17964812 |
| | 9 HP x 2 Nos , Q = 63750 LPH & HEAD = 18 m<br>18 HP x 2 Nos , Q = 12750 LPH & HEAD = 18 m<br>38 HP x 1 Nos, Q = 29750 LPH & HEAD = 18 m | |
| 4.2 | Non clog Submersible sewage Pumping Machinery at STP & SCADA Automation | 25333143 |
| | 30 HP x 2 Nos , Q = 53 LPS & Head = 21 m<br>65 HP x 2 Nos , Q = 106 LPS & Head = 23 m<br>155 HP x 1 Nos Q = 220 LPS & Head = 29 m | |
| 4.3 | Manhole Pumping Station @ Lift Station 1 | 6023761 |
| 5 | Rising Main Balance Work-200 mm DI K-9, L = 400 m | 1363333 |
| 6 | Rising Main - 450 mm to 150 mm DI K-9 , L = 3020 m | 22876060 |
| 7 | STP (SBR Technology) - Capacity 9.5 MLD | 143357634 |

| Sr. No. | Description | Amount in Rs. |
|---|---|---|
| 8 | Miscellaneous works of STP of Zone 2 & 3 | 64071060 |
| 9 | Miscellaneous works of 9.5 MLD STP of phase II | 55258695 |
| | Total | 2096470090 |
| | 18 % GST | 377364616 |
| | 1% for TS Charges | 20964701 |
| | 0.1% labour cess charges | 2096470 |
| | Gross Cost | 2496895877 |
| | **Say Rs.** | **249.68 Cr.** |
| | प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी | कार्यादेश दिनांकापासून २४ महिने |

०३. गोंदिया नगरपरिषदेच्या सदर मलनि:स्सारण प्रकल्पाची Opex किंमत गोंदिया नगरपरिषदेने उभारणे आवश्यक आहे. सदर प्रकल्प पुर्ण करण्याचा कालावधी २४ महिने राहील.

०४. गोंदिया नगरपरिषदेच्या मलनि:स्सारण प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे: -

४.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण राहील.

४.२ प्रकल्पासाठी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा गोंदिया नगरपरिषदेमार्फत भरण्यात यावा.

४.३ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन शासन निर्णयानुसार सदरप्रकल्पाची अंमलबजावणी करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.४ सदर प्रकल्पास मान्यता देताना राज्यस्तरीय तांत्रिक समितीने विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

४.५ राज्य शासनाने संदर्भाधिन क्र. २ व ३ नुसार विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया व अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील. तसेच या प्रकल्पासाठी डी. आय. पाईप्ससह सर्व प्रकारच्या पाईप्सचा देखील निविदेत समावेश करण्यात यावा.

४.६ महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने केंद्र पुरस्कृत अमृत २.० अभियानातील पाणीपुरवठा व मलनि:स्सारण प्रकल्पांसाठी निर्गमित केलेल्या आदर्श निविदा पुस्तिकेनुसार प्रसिध्द करणे बंधनकारक राहील.

४.७ सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश प्रशासकीय मंजूरीच्या आदेशापासून ४५ दिवसांच्या आत देण्यात येतील याची कार्यान्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४.८ केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत केंद्र शासनाने विहित केलेल्या सुधारणांची (Reforms) पूर्तता विहित कालावधीत पूर्ण करणे संबंधित अभियान शहरास बंधनकारक राहील.

४.९ **निधी वितरणाची कार्यपद्धती :** केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार केंद्र शासन हिश्याचा निधी हा तीन टप्यात (२० %+४० %+ ४० % ) वितरीत केला जाणार आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य हिश्याचा निधी केंद्र हिस्सा वितरीत करताना सोबत वितरीत केला जाईल.

४.१० अमृत अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना नागरी स्थानिक स्वराज संस्थांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या वित्त आयोगाच्या निधीशी सांगड (Convergence)घालणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी वित्त आयोगातून मिळणारा निधी चिन्हांकीत करून ठेवावा.

४.११ सदर अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सदर प्रकल्पासाठी वितरीत करण्यात येणारा निधी हा कार्यात्मक साध्यांवर (Functional Outcome) आधारित असणार आहे. तसेच, सदर कार्यात्मक परिणामाची पूर्तता न झाल्यास सदर प्रकल्पास निधी वितरीत करण्यात येणार नाही. सदर बाबींची पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी मुख्याधिकारी, गोंदिया नगरपरिषद व महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची राहील.

४.१२ सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्याचा प्रथम हप्त्याचा निधी कार्यादेश निर्गमित केल्यानंतर गोंदिया नगरपरिषदेस वितरीत करण्यात येईल. त्यानुसार केंद्र शासनाने विहित केल्यानुसार उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर केल्यानंतर व कार्यात्मक साध्यांची पूर्तता केल्यानंतर पुढील हप्त्याचा केंद्र हिश्याचा व त्याप्रमाणात राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४.१३ अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्था हिश्याचा निधी उभा करून सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात शासनास सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

४.१४ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाने वितरीत निधीच्या प्रमाणात गोंदिया नगरपरिषदेने स्वतंत्र बँक खाते उघडून त्यामध्ये निधी ठेवणे अनिवार्य राहील. सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

४.१५ राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाच्या शासन निर्णय क्र. ग्रापाधो-२०२१/प्र.क्र.१२२/पापु-०६, दिनांक २९ जून, २०२२ मध्ये नमुद कारणा व्यतिरिक्त वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

४.१६ सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीत पूर्ण करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित गोंदिया नगरपरिषद, कार्यान्वयन यंत्रणा, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार व प्रकल्प व्यवस्थापन व विकास सल्लागार यांची संयुक्तरीत्या राहील.

४.१७ प्रकल्पाचे काम सुरु झाल्यानंतर प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केल्यानंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१८ अमृत २.० अभियानांतर्गत मार्गदर्शक सूचनेनुसार संदर्भाधिन क्र.०३ नुसार सदर प्रकल्पासाठी प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराची नेमणूक करावी. त्यामध्ये नमूद

केल्यानूसार प्रकल्प व्यवस्थापक शुल्क अदा करावे तसा ठराव संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करणे बंधनकारक राहील.

४.१९ गोंदिया नगरपरिषदेच्या मलनि:स्सारण प्रकल्पासाठी स्वहिश्याची तरतूद, आवश्यक परवानग्या घेऊन व प्रकल्पातील सर्व उपांगाच्या जागा नगरपरिषदेच्या ताब्यात असल्याची खातरजमा करूनच प्रकल्पाचे कार्यादेश निर्गमित करण्याची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व मुख्याधिकारी, गोंदिया नगरपरिषद यांची राहील.

४.२० गोंदिया नगरपरिषदेस यापूर्वी युआयडीएसएसएमटी/ अमृत अथवा इतर कोणत्याही योजनेंतर्गत मंजुर करण्यात आलेल्या प्रकल्पातील उपांगे व या प्रकल्पातील उपांगे यामध्ये व्दिरुक्ती (Duplication) होत नसल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्था, कार्यान्वयन यंत्रणा, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार व महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची राहील.

०५. केंद्र शासन पुरस्कृत अमृत २.० अभियांनाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या सर्व मार्गदर्शक सुचना गोंदिया नगरपरिषदेच्या मलनि:स्सारण प्रकल्पास लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०७१०१४५०३८३७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT CHANDRAKANT ANDGE

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2024.07.10 19:30:22 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) विभाग यांचे खाजगी सचिव.
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक.
६. प्रधान सचिव, पाणीपुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक.
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई.
१०. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई
११. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग.
१२. जिल्हाधिकारी, गोंदिया.
१३. जिल्हा प्रशासन अधिकारी, गोंदिया.
१४. मुख्याधिकारी, गोंदिया नगरपरिषद.
१५. निवड नस्ती, नवि-३३.